कर्तव्यस्थानी दिलेल्या शासकीय निवासस्थानासाठी अनुज्ञप्ति शुल्काची वसुली.

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

शासन निर्णय, क्रमांक घभाव. १४८९/४०/सेवा-५

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३० डिसेंबर १९९१

**पहा.**—(१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेपुर. १२८७/६४३/सेवा-१०, दिनांक २५ एप्रिल १९८८.

(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सीपीओ. १४७८/सीआर-३२७/सेवा-५, दिनांक १७ एप्रिल १९७८.

(३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक घभाव. १०८९/४६/सेवा-५, दिनांक २३ मार्च १९८९.

## शासन निर्णय

मुंबई नागरी सेवा नियम, १९५९, खंड १ मधील नियम ८४९ (बी) च्या तरतुदीनुसार कर्तव्यस्थानी दिलेल्या शासकीय निवासस्थानासाठी, शासकीय कर्मचाऱ्यास त्याच्या वित्तलब्धीच्या १० टक्के किंवा निवासस्थानाचे प्रमाणित भाडे ह्यापैकी जे कमी असेल तेवढे अनुज्ञप्ति शुल्क (Licence Fee) द्यावे लागते. दिनांक १ जानेवारी १९८६ पासून वेतनश्रेणीमध्ये केलेल्या सुधारणा लक्षात घेऊन शासकीय निवासस्थानाच्या अनुज्ञप्ति शुल्काच्या दरात सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाच्या काही काळ विचाराधीन होता. सर्व बाबींचा काळजीपूर्वक विचार करून शासन असा आदेश देत आहे की, शासकीय निवासस्थानासाठी अनुज्ञप्ति शुल्क (Licence Fee) ठराविक दराने आकारले जावे. त्यानुसार शासनाने कर्मचाऱ्यांच्या कर्तव्यस्थानी पुरविलेल्या निरनिराळ्या प्रकारच्या शासकीय निवासस्थानांसाठीचे अनुज्ञप्ति शुल्काचे (Licence Fee) दर खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे असतील व ते सर्व राज्यभर एकरूपतेनेच लागू असतील. संबंधित कर्मचाऱ्यांच्या वेतनानुरूप निवासस्थानाच्या पात्रतेचा विचार न करता प्रत्यक्षात ताब्यात असलेल्या निवासस्थानाच्या प्रकारासाठी अनुज्ञप्ति शुल्काची वसुली केली जाईल.

**तक्ता**

| अनुक्रमांक (१) | वेतनमर्यादा (२) | अनुज्ञेय निवासस्थानाचा प्रकार (३) | अनुज्ञेय चटई क्षेत्र (चौ. फूट) (४) | अनुज्ञप्ति शुल्काचा ठराविक दर (रुपये दरमहा) (५) |
|---|---|---|---|---|
| | रुपये | | | |
| १ | ७५०–१,२०० | एक | २२० पर्यंत | ३० |
| २ | १,२०१–२,००० | दोन | २२१–३२० | ६५ |
| ३ | २,००१–२,७०० | तीन | ३२१–४२० | ११० |
| ४ | २,७०१–३,२०० | चार | ४२१–५५० | १४५ |
| ५ | ३,२०१–४,६०० | पाच | ५५१–७५० | २३० |
| ६ | ४,६०१ व त्याहून अधिक | सहा | ७५१–१,११० | ३५० |
| ७ | .... | सात (विशेष प्रकार) | १,१११ व त्याहून अधिक | ३५० |

२. अनुज्ञप्ति शुल्काचे सुधारित दर दिनांक १ सप्टेंबर १९९० पासून अंमलात येतील. दिनांक १ जानेवारी १९८६ ते ३१ ऑगस्ट १९९० या कालावधीतील अनुज्ञप्ति शुल्काची वसुली शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक घभाव. १०८९/४६/सेवा-५, दिनांक २३ मार्च १९८९ मधील आदेशानुसार करण्यात यावी. त्या आदेशानुसार केलेल्या वसुलीमध्ये बदल होणार नाही. दिनांक १ सप्टेंबर १९९० पासूनच्या कालावधीची अतिरिक्त वसुली मासिक वेतन देयकातून ५ हप्त्यांत वसूल करण्यात यावी.

३. काही शासकीय निवासस्थानांना सेवकांसाठी निवासव्यवस्था आणि/अथवा स्वतंत्र वाहनतळ, छप्पर असलेली किंवा छप्पर नसलेली जागा (गॅरेज) जोडलेली असते. शासन असा आदेश देत आहे की, दिनांक १ सप्टेंबर १९९० पासून मुख्य निवासस्थानाच्या धारकाकडून सेवकाच्या निवासव्यवस्थेसाठी व चार चाकी वाहनाच्या वाहनतळासाठीच्या (गॅरेजच्या) अतिरिक्त जागेसाठी खालीलप्रमाणे स्वतंत्र शुल्काची वसुली करण्यात यावी :—

| मुख्य निवासस्थानाबरोबरची अतिरिक्त जागा | शुल्काचा दर (रु. दरमहा) |
| --- | --- |
| (१) सेवकाचे निवासस्थान .. .. .. .. .. | ३० |
| (२) स्वतंत्र वाहनतळ (गॅरेज) .. .. .. .. .. | ३० |
| (३) वाहनासाठी छप्पर असलेली जागा .. .. .. .. .. | २० |
| (४) वाहनासाठी उघडी जागा .. .. .. .. .. | १० |

४. वर परिच्छेद १ मध्ये विहित केलेल्या दराने करावयाच्या अनुज्ञप्ति शुल्काच्या वसुलीशिवाय सेवा शुल्काची (Service Charges) स्वतंत्र वसुलीही तशीच चालू ठेवण्यात यावी. शासनाने असेही ठरविले आहे की, दिनांक १ सप्टेंबर १९९० पासून विद्यमान सेवा शुल्क दुप्पट करण्यात यावे. सेवा शुल्काचे दर वाढविल्यामुळे निघणारी वसुली मासिक वेतन देयकातून पाच हप्त्यांत वसूल केली जावी. प्रत्येक निवासस्थानासाठी किंवा निवासस्थानांच्या समुहांसाठी सेवा शुल्काचे सुधारित दर दर्शविणारे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत स्वतंत्रपणे निर्गमित केले जात आहेत.

५. वर (२) येथे निर्देशिलेला शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सीपीओ. १४७८/सीआर/३२७/सेवा-५, दिनांक १७ एप्रिल १९७८ मधील परिच्छेद ३ निष्प्रभावित करून शासन असाही आदेश देत आहे की, सेवा शुल्काच्या माफीसाठी असलेली वित्तलब्धीवरील रु. ४७५ ची विद्यमान मर्यादा सुधारित वेतनश्रेणीत रु. १,४५० इतकी वाढविण्यात यावी.

६. वर (१) येथे निर्देशिलेल्या शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेपुर. १२८७/६४३/सेवा-१०, दिनांक २५ एप्रिल १९८८ मधील परिच्छेद ५ मध्ये अंशत: बदल करून शासन असाही आदेश देत आहे की, भाडेमाफ निवासस्थानाच्या बदल्यात द्यावयाची घरभाडे भत्त्याची रक्कम, सर्वसाधारणपणे देय होऊ शकणारा घरभाडे भत्ता अधिक वेतनाच्या आधारे ज्या प्रकारचे निवासस्थान मिळण्यास संबंधित कर्मचारी पात्र असेल त्याप्रकारच्या निवासस्थानासाठी आकारण्यात येणारे अनुज्ञप्ति शुल्क ह्याच्या आधारे निश्चित केली जाईल.

७. मुंबई नागरी सेवा नियम, १९५९ मधील ह्यासंबंधातील सध्याच्या तरतुदी या आदेशाच्या मर्यादेपर्यंत सुधारण्यात आल्या आहेत असे समजले जावे. या नियमांना औपचारिक सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

८. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**मंगला मं. कोरगावकर,**
शासनाच्या उप सचिव.

प्रती

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्रमांक २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, वित्त विभाग-सेवा-५.

---

*पत्राद्वारे

# GOVERNMENT OF MAHARASHTRA

## FINANCE DEPARTMENT

Resolution No. वभाव. 1489/40-SER-5,

Mantralaya, Bombay 400 032, dated 30th December 1991

*Read.*—(*i*) Government Resolution, Finance Department, No. RPS. 1287/643/SER-10, dated 25th April 1988.

(*ii*) Government Resolution, Finance Department, No. CPA. 1478/CR-327/SER-5, dated 17th April 1978.

(*iii*) Government Circular, Finance Department, No. वभाव. 1089/46/SER-5, dated 23rd March 1989.

## *GOVERNMENT RESOLUTION*

According to the provision of Rule 849(*b*) of the Bombay Civil Services Rules, 1959, Volume I a Government servant who is provided with Government residence at the place of his duty has to pay a licence fee equal to 10 per cent of his emoluments or the standard rent of the residence whichever is less. The question of revising the licence fee for Government residences, in the light of the revision of pay-scales with effect from 1st January 1986, was under consideration of Government for sometime. After careful consideration, Government is pleased to direct that the licence fee for Government residences should be charged at flat rates. Accordingly, the flat rates of licence fee for different types of residences provided by Government at the place of duty of the employees, shall be as shown in the table below and should be uniformally applicable throughout the State. Recovery of licence fee shall be made for the type of residence actually occupied, irrespective of the entitlement of residence with reference to the pay of the concerned employee.

TABLE

| Serial No. (1) | Pay range (2) | Entitled Type of Residence (3) | Admissible carpet area (In. sq. ft.) (4) | Flat rate of licence fee per month (5) |
|---|---|---|---|---|
| | Rs. | | | Rs. |
| 1 | 750--1,200 .. .. | I | Upto 220 | 30 |
| 2 | 1,201—2,000 .. .. | II | 221—320 | 65 |
| 3 | 2,001—2,700 .. .. | III | 321—420 | 110 |
| 4 | 2,701—3,200 .. .. | IV | 421—550 | 145 |
| 5 | 3,201—4,600 .. .. | V | 551—750 | 230 |
| 6 | 4,601 and above .. .. | VI | 751—1,110 | 350 |
| 7 | .... | VII (Spl. type) | 1,111 and above | 350 |

H 2983—2 (15,000—2-92)

2. The revised rates of the licence fee are effective from 1st September 1990. Recovery of the licence fee for the period from 1st January 1986 to 31st August 1990 should be regulated according to the orders contained in Government Circular, Finance Department, No. घभाव. १०८९/८६/सेवा ५, dated the 23rd March 1989. Additional recovery for the period from 1st September 1990 should be recovered through the monthly pay bills in five instalments.

3. Some of the Government residences have attached servant quarters and/or exclusive garages/parking space with roof or open parking space. Government is pleased to direct that with effect from 1st September 1990, separate charges for servant quarters and for the additional space for garages for four-wheelers, shall be recovered from the allottee of the main residences at the following rates :—

| Additional space attached to the main residence | Rate of charges |
|---|---|
| | (Rs. per month) |
| (*i*) Servant's quarters .. .. .. .. .. .. | 30 |
| (*ii*) Garage with exclusive possession .. .. .. .. | 30 |
| (*iii*) Parking space with roof .. .. .. .. .. | 20 |
| (*iv*) Open parking space .. .. .. .. .. .. | 10 |

4. In addition to the recovery of licence fee at the rates prescribed in paragraph 1 above, service charges shall continue to be recovered separately. Government has further decided that the present service charges should be doubled with effect from 1st September 1990. Recoveries on account of the enhanced rate of service charges should be made through the monthly pay bills in five instalments. Detailed orders showing revised rates of service charges in respect of each residence or a group of residences are being issued by the Public Works Department separately.

5. In supersession of para. 3 of Government Resolution, Finance Department, No. CPA. 1478/CR-327/SER-5, dated the 17th April 1978 cited at (*ii*) above, Government is pleased to direct that the present limit of Rs. 475 per month of emoluments prescribed for exemption from payment of service charges, shall be raised to Rs. 1,450 in the revised pay-scales.

6. In partial modification of paragraph 5 of Government Resolution, Finance Department, No. RPS. 1287/643/SER-10, dated 25th April 1988 cited at (*i*) above, Government is pleased to direct that the amount of House Rent Allowance in lieu of rent-free quarters shall be determined on the basis of the House Rent Allowance that would have been normally admissible *plus* the amount of licence fee chargeable for that type of residence to which the concerned employee is entitled to, on the basis of his pay.

7. The existing provisions of the Bombay Civil Services Rules, 1959 in this respect should be deemed to have been amended to the extent of the provisions of this resolution. Formal amendments to these rules will be made in due course.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

M. M. KORGAONKAR,
Deputy Secretary to Government.